आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१४/प्र.क्र.१२०/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख-१९ मार्च, २०१५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्रमांक- माविम-२००२/प्र.क्र.१०६/ का-१०, दिनांक ५ फेब्रुवारी, २००७.

२. शासन निर्णय समक्रमांक दि.३० डिसेंबर,२०१४.

**प्रस्तावना :-**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्यास शासन निर्णय क्रमांक- माविम-२००२/ प्र.क्र.१०६/ का-१०, दिनांक ५ फेब्रुवारी, २००७ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदरचा कार्यक्रम राबविण्याबाबत केंद्र शासन, महाराष्ट्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी यांच्यामध्ये दिनांक १२.१०.२००६ रोजी करार झाला आहे.

२. सन २०१४- १५ या आर्थिक वर्षात महिला आर्थिक विकास महामंडळाला तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम योजनेंतर्गत २२३५-३२१२ या लेखाशिर्षाखाली एकूण ₹६६.६६ लक्ष (अक्षरी रुपये सहासष्ट लक्ष सहासष्ट हजार फक्त) निधी प्राप्त झाला होता. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र माविमने शासनास सादर केले आहे. २२३५-३२१२ या लेखाशिर्षाखाली ६० टक्के मर्यादेतील उर्वरित अवितरीत तरतूद माविमला वितरित करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरिता राज्य शासनाचा समभाग सामाजिक न्याय विभागामार्फत विशेष घटक योजने अंतर्गत उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीमधून२२३५-३२१२ या लेखाशिर्षाखाली ६० टक्के मर्यादेतील उर्वरित अवितरीत तरतूद ₹५३,३४,०००/- (अक्षरी रुपये त्रेप्पन लक्ष चौतीस हजार फक्त) इतका निधी माविमला वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित करावा व माविमने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त, पुणे व शासनास सादर करावे.

३. मुक्त करण्यात आलेले अनुदान जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाद्वारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

४. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (०३) (०७) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८७ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदाने, महिला आर्थिक विकास महामंडळ (२२३५ ३२१२) (महिला सक्षमीकरण) (विशेष घटक योजना) (कोषागारातून देय) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१५१ / १५ व्यय-सहा दि. १०.३.२०१५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०३१९१६५९०३४६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Ramchandra Divekar

Digitally signed by Manohar Ramchandra Divekar
DN: CN = Manohar Ramchandra Divekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.03.23 12:03:56 +05'30'

**म.रा.दिवेकर**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग.
११. निवड नस्ती, का-१०.